**बाळासाहेब ठाकरे राष्ट्रीय स्मारकाच्या उभारणीसाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने केलेल्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्याबाबत.**
**(सन २०२३-२४)**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३२३/प्र.क्र.९३/नवि-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०२४.

**पहा :-**

१. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. एमआरडी-२०१८/प्र.क्र.१४७/नवि-०७,दि.१६.०३.२०२१.
२. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमआरडी-३३२२/प्र.क्र.१४७/नवि-७,दि.२३.०३.२०२३.
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दि.१२.०४.२०२३.
४. समक्रमांकाचा दि.२७.०२.२०२४ रोजीचा शासन निर्णय.
५. प्रमुख, अभियांत्रिकी, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांचे दि. १९.०३.२०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

स्वर्गीय बाळासाहेब ठाकरे यांच्या स्मृती जपण्यासाठी मुंबईतील शिवाजी पार्क, दादर येथील महापौर निवासस्थान परिसरातील जागेवर उभारावयाच्या स्व. बाळासाहेब ठाकरे यांच्या राष्ट्रीय स्मारक प्रकल्पाच्या रु.४०० कोटी खर्चाच्या सुधारित प्रकल्प प्रस्तावास संदर्भाधीन दिनांक १६ मार्च, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. प्रकल्पाच्या कामाच्या प्राधान्यानुसार टप्पा- १ व २ स्वरूपात काम हाती घेण्याबाबत निश्चिती करण्यात आली आहे. सर्वसाधारणपणे टप्पा-१ मध्ये स्थापत्य घटक व टप्पा-२ मध्ये तंत्रज्ञानाशी संबंधित घटकांचा समावेश आहे. सदर स्मारक प्रकल्पासाठी लागणारा खर्च सुरुवातीस मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून स्वनिधीतून करावयाचा असून प्राधिकरणाने केलेल्या खर्चाची प्रतिपूर्ती राज्य शासनाने करावयाची आहे.

स्वर्गीय बाळासाहेब ठाकरे स्मारक प्रकल्प बांधणीकरिता प्राधिकरणास आतापर्यंत रु. १९६.२१ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. स्मारक प्रकल्पावर प्राधिकरणाने केलेल्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्यासाठी चालू वित्तीय वर्ष सन २०२३-२४ मध्ये रु.१५० कोटी इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आली आहे. उक्त मंजूर तरतूदीमधून रु.८.७९ कोटी रक्कम सहाय्यक अनुदान स्वरूपात मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. बाळासाहेब ठाकरे राष्ट्रीय स्मारकाच्या उभारणीसाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने केलेल्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्याच्या प्रयोजनार्थ **रु.८,७९,००,०००/- (अक्षरी रुपये आठ कोटी एकोणऐंशी लाख फक्त)** इतकी रक्कम सहाय्यक अनुदान स्वरुपात मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त रक्कम “मागणी क्र. एफ-२, २२१७-नगर विकास, ८०, सर्वसाधारण, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००)(९२) बाळासाहेब ठाकरे राष्ट्रीय स्मारकाच्या बांधकामासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला सहाय्यक अनुदान, सांकेतांक (२२१७A४१२) ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर), (कार्यक्रम)/दत्तमत) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ मधील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची घालण्यात यावी.

३. उपरोक्त लेखाशीर्ष उपयोगात आणण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५, यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच सह सचिव नवि-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. नगर विकास विभागाच्या रोख शाखेने देयक तयार करुन ते अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे पाठवावे. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही नवि- ३१ कार्यासनाने करावी. सदरचे निधी वितरण **बिनशर्त** स्वरुपाचे आहे.

४. सदरचा निधी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडे जमा झाल्याचे प्रमाणपत्र या विभागास सादर करण्यात यावे.

५. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर केले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

६. सदर प्रकल्पासाठी प्राप्त होणाऱ्या निधीसाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने स्वतंत्र लेखे ठेवावेत.

८. राज्यशासनाकडून दिल्या जाणाऱ्या सदर अनुदानासाठी राज्यशासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या अनुदान विषयीच्या इतर संबंधीत अटी व शर्ती लागू राहतील.

९. राज्य शासनाने बाळासाहेब ठाकरे राष्ट्रीय स्मारकाच्या उभारणीसाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने केलेल्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्याच्या प्रयोजनार्थ आतापर्यंत रु. १९६.२१ कोटी रुपये इतका निधी सहाय्यक अनुदान स्वरुपात वितरीत करण्यात आला आहे.

सदर आदेशान्वये वितरीत होणाऱ्या निधीनंतर होणाऱ्या एकूण वितरीत निधीची परिस्थिती खालील प्रमाणेः

| अ.क्र. | दिनांक | रक्कम (रु.कोटी) | निधी वितरीत करणाऱ्या संस्थेचे नाव | एकूण वितरीत निधी (रु.कोटी) |
|---|---|---|---|---|
| १ | २४.०६.२०२२ | २१.०० | राज्य शासन | २१.०० |
| २ | २८.०९.२०२२ | १४.०० | राज्य शासन | ३५.०० |
| ३ | ०९.०१.२०२३ | १४.०० | राज्य शासन | ४९.०० |
| ४ | २३.०३.२०२३ | ३१.०० | राज्य शासन | ८०.०० |
| ५ | २९.०३.२०२३ | २०.०० | राज्य शासन | १००.०० |
| ६ | ११.०८.२०२३ | ३०.०० | राज्य शासन | १३०.०० |
| ७ | ३०.१०.२०२३ | ३०.०० | राज्य शासन | १६०.०० |
| ८ | २७.०२.२०२४ | ३६.२१ | राज्य शासन | १९६.२१ |
| ९ | सदरचे वितरण | **८.७९** | राज्य शासन | **२०५.००** |

९. सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३ दि. १२ एप्रिल, २०२३ सोबतच्या परिशिष्ठामधील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

१०. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.२०७/व्यय-३,दि.३०.०१.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३३०१४१४२२७४२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2024.03.30 14:23:35 +05'30'

**[विजय चौधरी]**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव.
मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-१), मंत्रालय, मुंबई.
महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
निवासी अधिदान व लेखा अधिकारी, (लेखा परीक्षा), मुंबई.
सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२ .
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
वित्त विभाग कार्यासन- व्यय-३, अर्थसंकल्प-१६.
नियोजन विभाग (कार्यासन १४४४)
सह सचिव नवि-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी नवि-४/नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ .
रोख शाखा (३ प्रती),
निवड नस्ती, नवि-७.